राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत महात्मा फुले जल-भूमी अभियानासाठी सन २०१५-१६ करीता ₹४० कोटी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत ....

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राकृवि ०४१५/प्र.क्र. ३१/राकृवियो कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
तारीख: २२ मे, २०१५

**वाचा :**

१) केंद्र शासनाचे पत्र क्र. ७-१/२०१५- आरकेव्हीवाय, दि. १५ एप्रिल, २०१५.

**प्रस्तावना :**

११ व्या पंचवार्षिक योजनाकाळात कृषि व कृषि संलग्न क्षेत्राचा विकास दर ४% साध्य करण्याकरीता केंद्र शासनाने सन २००७-०८ या वर्षापासून राष्ट्रीय कृषि विकास योजना सुरु केलेली आहे. सदरची योजना १२ व्या पंचवार्षिक योजनेमध्येही राबविण्यात येत आहे. सदरहू योजनेचा केंद्र शासनाकडून उपलब्ध झालेला निधी जमा करण्याकरिता आयुक्त (कृषि) यांचे नावे नवीन स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) उघडण्यात आलेले आहे.

सन २०१५-१६ पासून राष्ट्रीय कृषि विकास योजना केंद्र व राज्य शासनाच्या ५०: ५० अर्थसहाय्याने राबविण्यात येणार आहे. चालू वर्षी केंद्र शासनाने दि. १५ एप्रिल, २०१५ रोजीच्या पत्रान्वये राज्याकरीता राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत 'सर्वसाधारण राकृवियो (Normal RKVY)' करीता ₹ ३११.६२ कोटी रकमेचे नियतवाटप (Allocation) जाहीर केले आहे.

चालू वर्षी राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अद्याप केंद्र शासनाने निधी वितरीत केला नाही तथापि, राज्यातील दुष्काळ सदृष्य परीस्थितीच्या पार्श्वभूमीवर महात्मा फुले जल-भूमी अभियानांतर्गत हाती घ्यावयाच्या विविध कामांकरीता आयुक्त (कृषि) यांना राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत निधी वितरीत करण्याच्या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:**

१. सन २०१५-१६ करीता राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत 'महात्मा फुले जल-भूमी अभियानासाठी' ₹ ४० कोटी (रुपये चाळीस कोटी फक्त) निधी या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि), पुणे यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे पुढीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचे नाव | मंजूर निधी ( ₹ कोटी) |
|---|---|---|
| १. | 'महात्मा फुले जल-भूमी अभियान | ४०.०० |
| | **एकूण** | **४०.००** |

'महात्मा फुले जल-भूमी अभियानासाठी' उपरोक्त मंजूर ₹ ४०.०० कोटी निधी राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत मुख्य सचिव तथा अध्यक्ष, राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या मान्यतेस अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे. सदर रक्कमेच्या कोषागारातून आहरण व वितरणाकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध झालेली ₹ ४० कोटी इतकी रक्कम कोषागारातून आहरित करुन आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नावे उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) मध्ये जमा करावी व तसे शासनास अवगत करावे.

३. आयुक्त (कृषि) यांनी सदर ₹ ४० कोटी निधी राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीकरिता संबंधित विभाग/यंत्रणांच्या मागणी नुसार, जलसंधारण विभागाने प्रस्तावित केलेल्या वित्तीय मर्यादेमध्ये संबंधित विभाग/यंत्रणांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावा.

४. राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत उपलब्ध झालेला ₹ ४० कोटी (रुपये चाळीस कोटी फक्त) निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१५-१६ करिता अर्थसंकल्पित तरतुदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्रमांक डी -३
२४०१- पीक संवर्धन
(००) (८००) इतर खर्च
(००) (०९) राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य
(२४०१ ८२३५) योजनांतर्गत/दत्तमत
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
(१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना)
३३-अर्थसहाय्य

५. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधीचे तात्काळ उपयोजन होण्याच्या हेतूनेच कोषागरातून आहरीत करावा आणि सर्व अंमलबजावणी यंत्रणांनी/विभागांनी त्यांना प्राप्त होणा-या निधीचा तात्काळ विनियोग करावा. तसेच अंमलबजावणी यंत्रणांनी सदर निधी उपयोजनाविना बँक खात्यामध्ये जमा करुन ठेवू नये.

६. केंद्र शासनाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सन २००७-०८ पासून सन २०१२-१३ पर्यंत विविध विभागांना वितरीत करण्यात आलेल्या निधीचे लेखापरीक्षण होऊन तसे प्रमाणित केल्यासच सदर योजनेंतर्गत उर्वरीत निधी दुसऱ्या टप्प्यामध्ये वितरीत करण्यात येईल, असे निर्देशीत केलेले आहे. यास्तव सन २००७-०८ ते सन २०१२-१३ या कालावधीत सर्व अंमलबजावणी यंत्रणांना/विभागांना

वितरीत करण्यात आलेल्या निधीचे लेखापरीक्षण होऊन लेखा आक्षेपांची पूर्तता केली असली तरच संबंधित यंत्रणांना दुसऱ्या टप्प्यातील निधी वितरीत करण्यात येईल. सबब, सर्व अंमलबजावणी यंत्रणांनी/विभागांनी त्यांना सन २००७-०८ ते सन २०१२-१३ या कालावधीत वितरीत करण्यात आलेल्या निधीचे लेखापरिक्षण झाल्याचे प्रमाणित करावे.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने आणि वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक ४४०/२०१५/व्यय-१५ दि. १५/०५/२०१५, अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२५१२१७२१०८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and adf, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2015.05.25 12:21:43 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (कृषि व पणन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (जलसंधारण), मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. संचालक (नियोजन व प्रक्रिया), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
८. संचालक (मृद संधारण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
९. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१०.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
११.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१३.सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१४.वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
१५.निवड नस्ती.